**चौराई येथे धरण झाल्यास महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या येव्यात होणाऱ्या तुटीमुळे होणारे संभाव्य नुकसान भरुन काढण्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५ /प्र.क्र. ४१२/१५/जसं (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८/१०/ २०१६

**प्रस्तावना:-**

१. तोतलाडोह (पेंच प्रकल्प) हा मध्यप्रदेश व महाराष्ट्रातील आंतरराज्य प्रकल्प आहे. तोतलाडोह हे धरण मध्यप्रदेश व महाराष्ट्र यांच्या सिमेवर आहे. तोतलाडोह धरणातून विद्युत निर्मितीनंतरचे पाणी नवेगांव खैरी येथील धरणात साठवून त्यांनतर त्याचा उपयोग प्रामुख्याने नागपूर शहरास पिण्याच्या पाण्यासाठी तसेच नागपूर व भंडारा जिल्ह्यातील सुमारे १ लक्ष हेक्टर सिंचनासाठी केला जातो.
२. मध्यप्रदेश व नागपूर यांच्यामध्ये सन १९६४ मध्ये या प्रकल्पाबाबत करार झाला आहे. या कराराच्यावेळी राज्य सिमेपर्यंत पेंच पाणलोट क्षेत्रातून ६० अब्ज घनफुट (१६९९ दलघमी) ७५ टक्के विश्वासार्ह येवा अपेक्षित केला होता. यापैकी ३५ अब्ज घनफुट (९९१ दलघमी) पाणी मध्यप्रदेश राज्यास तोतलाडोह धरणाच्या वरील प्रकल्पातील पाणी वापरासाठी अनुज्ञेय आहे व महाराष्ट्रास उर्वरित २५ अब्ज घनफुट तसेच मध्यप्रदेश शासनाच्या पाणी वापरातून उपलब्ध होणाऱ्या पुर्नउद्भवामुळे ( रिजनरेशन ) ५ अब्ज घनफूट असे एकूण ३० अब्ज घनफूट (८४९.६० दलघमी ) पाणी अनुज्ञेय आहे.
३. दिनांक १८.१२.६८ च्या करारानुसार पेंच पाणलोट क्षेत्रात ६० अब्ज घनफूट पेक्षा कमी पाणी उपलब्ध असलेल्या वर्षात मध्यप्रदेशाचा वाटा ३५/६० प्रमाणात कमी करण्याची तरतूद आहे. तथापि तो कमीत कमी २० अब्ज घनफूट असावा अशीही तरतूद आहे.
४. सन १९७६ ते २००७ मधील अद्ययावत पर्जन्यमानाच्या आकडेवारीनुसार तोतलाडोह धरण स्थळापर्यंत ( राज्य सिमेपर्यंतचा )७५ टक्के विश्वासार्ह भाग ४२.४६अब्ज घनफूट इतका आहे (जो पूर्वी ६० अब्ज घनफूट अंदाजित केला होता ). दिनांक १८.१२.१९६८ च्या करारानुसार मध्यप्रदेशाचा वाटा ४२.४६ x ३५/६०=२७.७७ अब्ज घनफूट येतो.
५. मध्यप्रदेश शासनाने पेंच नदीवर चौराई धरण प्रस्तावित केले आहे. सदर चौराई धरणाची घळभरणी जून २०१६ पर्यंत होणे आवश्यक आहे. सदर चौराई धरणातून २१.३२ अब्ज घनफूट पाणी वापर प्रस्तावित आहे. तथापि सदर चौराई धरणातील पाणी वापरासह मध्यप्रदेश राज्यातील पेंच खोऱ्यातील पाणी वापर ६७८.५५ दलघमी ( २३.९६ अब्ज घनफूट ) इतका आहे व तो मध्यप्रदेश शासनास अनुज्ञेय २४.७७ अब्ज घनफूट पाणी वापराच्या मर्यादेत आहे.
६. सारांशाने मध्यप्रदेश शासनाने चौराई धरणाची घळभरणी केल्यानंतर महाराष्ट्रास आतापर्यंत उपलब्ध होणाऱ्या पाण्याचे तुलनेत घट होणार आहे. मात्र, राज्यास करारानुसार अनुज्ञेय

पाण्यावर मध्यप्रदेश शासनाद्वारे चौराई धरणाच्या माध्यमातून कोणतेही अतिक्रमण होत नाही. आतापर्यंत मध्येप्रदेश शासनाच्या वाट्याचे जे पाणी महाराष्ट्रास मिळत होते ते यापुढे मिळणार नाही ही वस्तुस्थिती आहे. त्यामुळे मा. डि मल्लीकार्जुन रेड्डी, विसस यांनी प्रस्तावित केल्यानुसार, चौराई धरणाचे बांधकाम थांबविणेबाबत मध्यप्रदेश शासनावर कोणतेही निर्बंध घालता येत नाहीत.

या पार्श्वभूमीच्या अनुषंगाने चौराई येथे धरण झाल्यास महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या येव्यात होणाऱ्या तुटीमुळे होणारे संभाव्य नुकसान भरुन काढण्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी समिती स्थापन करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

चौराई येथे धरण झाल्यास महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या येव्यात होणाऱ्या तुटीमुळे होणारे संभाव्य नुकसान भरुन काढण्यासाठी उपाययोजना सुचविण्याच्या दृष्टीने कार्यकारी संचालक यांच्या अध्यक्षतेखाली स्थानिक लोकप्रतिनिधी सह समिती गठित करण्यात येत आहे.

**अ) समितीची रचना :**

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १. | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधांरे विकास महामंडळ, नागपूर | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागूपर | सह अध्यक्ष |
| ३. | श्री. कृपालजी बालाजी तुमाने, खासदार रामटेक लोकसभा क्षेत्र | सदस्य |
| ४. | श्री. नानाभाऊ फाल्गुनराव पटोले, खासदार, भंडारा लोकसभा क्षेत्र | सदस्य |
| ५. | श्री. डि मल्लीकार्जून रेड्डी, आमदार, रामटेक विधानसभा क्षेत्र | सदस्य |
| ६. | श्री. सुनिल छात्रपाल केदार, आमदार सावनेर विधानसभा क्षेत्र | सदस्य |
| ७. | श्री. रामचंद्र पुनाजी अवसरे, आमदार, भंडारा विधानसभा क्षेत्र | सदस्य |
| ८. | श्री. चरणजी सोविंदा वाघमारे, आमदार, तुमसर विधासभा क्षेत्र | सदस्य |
| ९. | विभागीय कृषी सहसंचालक, नागपूर विभाग, नागपूर | सदस्य |
| १०. | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, नागपूर | सदस्य सचिव |

| | | |
|---|---|---|
| ११. | अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर | सदस्य |
| १२. | कार्यकारी अभियंता, पेंच पाटबंधारे विभाग, नागपूर | सदस्य |
| १३. | कार्यकारी अभियंता, नागपूर पाटबंधारे विभाग, (दक्षिण) नागपूर | सदस्य |

ब ) **समितीचे मुख्यालय:**

**समितीच्या कामकाजाचे मुख्यालय, नागपूर येथे राहील. सदस्यांचे मुख्यालय ते सध्या वास्तव्यास असलेल्या ठिकाणी/कार्यरत असलेल्या ठिकाणी असेल.**

**क) समितीची कार्यकक्षा**

चौराई येथे धरण झाल्यास महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या येव्यात होणाऱ्या तुटीमुळे होणारे संभाव्य नुकसान भरुन काढण्यासाठी उपाययोजना सुचविण्याच्या दृष्टीने शासनास सल्ला देणे.

**ड) समितीचा कालावधी-**

चौराई येथे धरण झाल्यास महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या येव्यात होणाऱ्या तुटीमुळे होणारे संभाव्य नुकसान भरुन काढण्यासाठी उपाययोजना सुचविण्याच्या दृष्टीने समिती स्थापन झाल्यापासून सहा महिन्यात पूर्ण करेल.

**ई) समिती सदस्यांचे मानधन:**

(१)शासन निर्णय, वित्त विभाग क्र. शासाउ-१०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ., दि.१३.३.२०१२ अन्वये राज्य सार्वजनिक उपक्रमाचे अंशकालीन व राज्यमंत्री/मंत्री दर्जा प्राप्त अध्यक्ष/उपाध्याक्ष व संचालक मंडळाचे सदस्य यांना तसेच राज्यस्तरीय समिती/ परिषद/ आयोग यांचे अध्यक्ष व उपाध्याक्ष यांना द्यावयाच्या सेवासुविधांबाबत उपरोक्त शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार मानधन/सेवासुविधा अनुज्ञेय राहतील.

(२) शासकीय सेवेत कार्यरत असलेल्या सदस्यांना समितीच्या कामकाजात सहभागी होण्यासाठी कोणतेही मानधन अनुज्ञेय नसेल.

**फ) इतर बाबी:-**

१. समितीच्या दरमहा कमाल कामकाजाच्या दिवसांची मर्यादा (बैठका, दौरे, निवासस्थानी केलेले काम इत्यादीसह) पाच (५) इतकी असेल.

२. कामाच्या अनुषंगाने दूरध्वनी,फॅक्स, झेरॉक्स, टंकलेखन इत्यादीप्रित्यर्थ केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती देयकाच्या/प्रमाणकाच्या आधारे करण्यात येईल. मात्र भोजनादी खर्च (Boarding Charges) मानधनास अंतर्भूत असल्याने त्यासाठी स्वतंत्र प्रतिपूर्ती अनुज्ञेय असणार नाही.

३. समितीच्या कामकाजासाठी उपस्थित राहण्याकरिता समिती अध्यक्ष व सदस्यांना प्रत्यक्षात केलेल्या प्रवास व दैनिक भत्ता शासन निर्णय, दि.१३.३.२०१२ च्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे अनुज्ञेय असेल.

४. शासकीय सेवेतून निवृत्त झालेल्या समिती अध्यक्ष/ सदस्य यांना ते सेवानिवृत्तीच्यावेळी ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदास अनुज्ञेय असलेल्या प्रकारानुसार )विमान/रेल्वे/बस इ.) प्रवास खर्चाची व निवास खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येईल. त्यानुसार हॉटेलमधील निवासाचा प्रत्यक्षात केलेला खर्च अनुज्ञेय मर्यादेत प्रतिपूर्तीसाठी ग्राहय धरण्यात येईल. मात्र वरील दैनिक मानधनाच्या दरात अन्य सर्व खर्च समाविष्ट असल्याने दैनिक भत्ता स्वतंत्रपणे अनुज्ञेय नसेल.

५. शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या समिती सदस्यांना त्यांच्या वेतनश्रेणीनुसार प्रवास खर्च व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. याबाबतच्या खर्चाची प्रतिपूर्ती त्यांना प्रवासभत्ता देयकाद्वारे ते कार्यरत असलेल्या कार्यालयाकडून उपलब्ध अनुदानातून करण्यात येईल.

६. कामकाजाच्या ठिकाणी विमानतळ/रेल्वे स्टेशन/बस स्थानक येथून येण्यासाठी व जाण्यासाठी तसेच शासकीय विश्रामगृह / हॉटेल येथून कामकाजाच्या ठिकाणी येण्यासाठी व जाण्यासाठी वाहन व्यवस्था विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेकडून करण्यात येईल.

७. समिती सदस्यांनी प्रत्येक महिन्यातील कामाचे दिवस व त्या दिवशी केलेल्या कामाचा संक्षिप्त तपशिल दर्शविणारी मासिक दैनंदिनी स्वयंप्रमाणित करुन समिती अध्यक्षांची / सहअध्यक्षांची प्रतिस्वाक्षरी घेऊन सदस्य सचिव यांना पाठविणे आवश्यक राहील, जेणेकरुन मानधन व अन्य अनुज्ञेय खर्चाची प्रतिपूर्ती करणे सुलभ होईल.

८. सदर कामासाठी येणारा खर्च प्रकल्पावर होणारा खर्च -"४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (०४) योजनेत्तर वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भागभांडवली अंशदान ४७०१ आय-१७१" या लेखा शिर्षातर्गत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१०२८१५३३२२०५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Rajnish
Ramkishor
Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2016.10.28 15:36:57 +05'30'

**( र.रा.शुक्ला )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव,
३. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,
४. मा. विरोधी पक्ष नेते , विधान सभा व विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
५. मा.मंत्री /राज्यमंत्री (जलसंपदा) ,यांचे स्वीय सचिव, मंत्रालय,मुंबई.

६. मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. मा. प्रधान सचिव, विधान सभा व विधान परिषद, विधान भवन, मुंबई
८. प्रधान सचिव (जसं) / प्रधान सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१०.महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक.
११.महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१३.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४.कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१५.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१६.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१७.मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
१८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधनी, नाशिक.
१९.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
२०.मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक.
२१.मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाक्षेवि, औरंगाबाद.
२२.मुख्य अभियंता, जलविकास केंद्र, वाल्मी परिसर, औरंगाबाद.
२३.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
२४.मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
२५.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
२६.मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, अमरावती
२७.मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
२८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
२९.मुख्य अभियंता, (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
३०.मुख्य अभियंता, (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प, पुणे.
३१.मुख्य अभियंता, जलविद्युत प्रकल्प (विद्युत) मुंबई.
३२.मुख्य अभियंता, यांत्रिकी संघटना नाशिक.
३३.मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुबई.
३४.मुख्य अभियंता, ल.पा (स्थानिक स्तर), येरवडा, पुणे.
३५.सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३६.सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३७.सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३८. जसंअ कार्यासन, संग्रहार्थ.